


**इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे येथे उप संचालक या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती व पदस्थापना.**
**श्री. प्रशांत दत्तात्रय काळे, गट विकास अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्थाप्र २०२५/प्र.क्र.३४/आस्था-२**
मंत्रालय विस्तार, पहिला मजला,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांकः- १७ एप्रिल, २०२५.

संदर्भः
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही - २०११ / प्र. क्र. १३७ / कार्यासन १२, दि. १७/१२/२०१६.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शाकानि-२०१७/प्र.क्र.३३/१८ (र.व का.) दि.९/३/२०१७.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६ /प्र.क्र.५१० / कार्या.१२, दि. १६ फेब्रुवारी, २०१८
४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना-२, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२
५) श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दौड, जि. परिषद,पुणे यांचा दि.२२/१२/२०२४ चा अर्ज.
६) महाराष्ट्र शासन, ग्राम विकास विभाग, पत्र क्र. RDD १३०११ /५५ /२०२५ /EST ३, दि.२८/२/२०२५.

**शासन निर्णयः-**

शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दि.०९ मार्च, २०१७ (संदर्भ क्र.२) अन्वये सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागातून इतर मागास बहुजन कल्याण या नवीन विभागाची निर्मिती करण्यात आली आहे. सदर नवनिर्मित विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांसाठी इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयाच्या आस्थापनेवरील ८२१ पदांच्या सुधारित आकृतीबंधास शासनाच्या उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेने संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयांन्वये मंजुरी देण्यात आली आहे. उक्तपणे मान्य विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयाच्या आकृतीबंधातील संवर्गनिहाय मंजूर पदांवर पदभरतीच्या अनुषंगाने सेवाभरती नियम तयार करणे, तद्नंतर पदभरतीसाठी जाहिरात देवून महाराष्ट्र लोकसेवा आयोग व विभागातील निवड समितीमार्फत भरती प्रक्रिया राबविणे यासाठी काही कालावधी लागणार असल्याने नियमानुसार नियमित पदभरती होईपर्यंच्या कालावधीत अन्य आस्थापनेवरील समकक्ष वेतनश्रेणीतील अधिकाऱ्यांकडून प्रतिनियुक्तीने नियुक्तीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.५ अन्वये प्राप्त इच्छूकतेनुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्रमांक १ व ३ मधील मार्गदर्शक

सूचनांच्या अधीन राहून सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री.प्रशांत द.काळे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दौंड, जि.परिषद, पुणे (वेतनश्रेणी एस-२३, ₹६७,७०० - ₹२०८,७००) यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे या कार्यालयातील उपसंचालक (वेतनश्रेणी एस-२३, ₹६७,७०० - ₹२०८,७००) या रिक्त पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४० परिशिष्ट तीन नुसार तसेच पुढील अटी / शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहेः-

१) श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांची उक्त पदावरील प्रतिनियुक्ती ते ज्या दिवशी सदर पदावर रूजू होतील त्या दिनांकापासून, प्रथमतः तीन वर्षांच्या कालावधीसाठी किंवा सदर पदावर नियमित अधिकारी उपलब्ध होईपर्यंत किवा विभागाच्या पुढील आदेशापर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत असेल.
२) श्री.प्रशांत द.काळे, गट विकास अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आवश्यकतेनुसार ग्राम विकास विभागाच्या सहमतीने वाढ करता येईल.
३) जर श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने मूळ आस्थापनेस आवश्यक वाटल्यास, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांच्या मूळ आस्थापनेच्या मागणीनुसार त्यांच्या सेवा प्रत्यार्पित करण्यात येतील.
४) श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांची सेवा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास आवश्यक नसल्यास प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाला नसला तरी त्यांच्या सेवा मूळ आस्थापनेस परत करण्याची मुभा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास राहील.
५) श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांनी जर आपल्या मूळ आस्थापनेकडे परत जाण्याचा उद्देश असल्यास, तशी किमान ३ महिन्याची लेखी पूर्वसूचना सक्षम प्राधिकाऱ्यास / शासनास दिल्यास नियमानुसार त्यांच्या सेवा मूळ आस्थापनेकडे प्रत्यावर्तीत करण्यात येतील.
६) श्री.प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांना उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कोणताही प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.
७) उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री.प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या रजा, गट विमा योजना, वैद्यकीय सवलत, रजा प्रवास सवलत इत्यादी सेवाविषयक बाबींच्या संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ विभागातील सेवाविषयक नियम लागू असतील.
८) उपरोक्त प्रतिनियुक्ती संदर्भातील अटी / शर्ती व अनुषंगिक प्रशासकीय बाबी इतर मागास बहुजन कल्याण विभाग आणि ग्राम विकास विभाग यांच्यात विचारविनिमय करून ठरविण्यात येतील.

२. श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी यांनी उक्त प्रतिनियुक्तीनुसार सध्या कार्यरत पदावरुन तात्काळ कार्यमुक्त होवून प्रतिनियुक्तीच्या कार्यालयात रूजू व्हावे, त्यासाठी त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास खर्च इत्यादी अनुज्ञेय असणार नाही.

३. सदर आदेश ग्राम विकास विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ येथील दि.२८.०२.२०२५ च्या पत्रातील सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१७१८४०४४२९३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.04.17 18:41:30 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

श्री. प्रशांत द. काळे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दौंड, जि. परिषद,पुणे

प्रत,

१. प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (सामाजिक न्याय), समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
४. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव, (आस्था ३), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री ( इ.मा.ब.क. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. प्रधान सचिव ( इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व प्रादेशिक उपसंचालक/सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,
११. निवडनस्ती.